वर्ष दुसरे अंक क्रमांक ४
दिनांक ३ जानेवारी २०१०

# आत्मशोध



**संपादक**

आनंद माने
स्वप्ना कोल्हे
सोनाली घाटपांडे
सचिन काकडे
भारती सरमळकर

**सहसंपादक**

सुरेश शिरोडकर



हा अंक कवी आल्हाद काशीकर यांच्या कवितांवर आधारित आहे. या अंकाचे सहसंपादक श्री. सुरेश शिरोडकर हे स्वतः कवी असून मराठी तसेच मालवणीत त्यांनी अनेक कविता लिहील्या आहेत. ते कवितांचे अभ्यासक आहेत त्यांना आल्हादच्या कवितांबद्दलची असणारी तळमळ त्यांच्यातल्या हळव्या कवी मनाची साक्ष देते.

## संपादकीय

नमस्कार दोस्तहो !

नेटाक्षरीच्या समस्त वाचक वर्गास नववर्षाच्या खूप खूप शुभेच्छा !

आणखी एक वर्ष सरलं, भिंतीवरचं कॅलेंडर बदललं, या वर्षात एक इन्क्रीमेंट झालं, पुढच्याही वर्षात ते होईल, या गोष्टी नवीन नाहीत परंतू तुमच्याच एखाद्या विसरलेल्या स्वप्नाला गेल्या वर्षाने खतपाणी घातलं का ? असेल तर या वर्षात त्या स्वप्नाची निगा राखायला विसरू नका. आणि नसेल तर या वर्षात नक्कीच पेरणीची आवश्यकता आहे. कोणास ठाऊक कदाचित या वर्षात ती स्वप्ने पुर्ण होणार असतील.

या धावपळीच्या जगामध्ये थोडं थांबा स्वतःसाठी, आजूबाजूच्या जगाचा थोडासा आस्वाद घ्या, क्षणाक्षणाला जग बदलतय. या बदलत्या जगात स्वतःला सामावू देताय की तुम्हीच जग बदलताय यावरच तुमचं अस्तित्व ठरेल, चिरंतन अथवा क्षणभंगूर...

नवीन वर्षाच्या सुरुवातीच्या या पहिल्याच अंकात नेटाक्षरी ची टीम तुमच्यासाठी घेऊन आली आहे एका ज्वलंत कवीच्या आत्मशोधातून निर्माण झालेल्या कवितांचा वणवा...

हा वणवा तुमच्या मनात क्रांतीच्या मशाली पेटवेल यात आमच्या टीमला यत्किंचितही शंका नाही.

आनंद माने
संपादक नेटाक्षरी टीम

## आत्मशोध

काही वेळा मन उदास होतं, असं वाटतं
आपण जे करतो ते आपल्याला आवडतं का ?
आपण जे करतो ते व्यवहारासाठी का ?
आपण आपला आत्मा गमावला तर नाही ?

मार्क्स चा दुराव्याचा सिद्धांत ( alination )
काय फ़क्त कामगारानांच लागू आहे ?
बौद्धिक क्षेत्रात काम करणारे
वेठ बिगार नाहीत काय?

आज प्रत्येक जण बटीक आहे कुणाचा तरी
मोठा असो छोटा असो !
मोठ्यांची गुलामी मोठी असेल,
अस्मिताशुन्य सुखासीनता असेल
शेवटी गुलाम तो गुलामच असणार!
पिंजरा सोन्याचा असो अथवा लोखंडाचा
स्वतःचा शोध घेण्याची किंमत सुद्धा मोठी असते

सुरक्षिततेला सुखासीनतेला प्रतिष्ठेला आणि
खोट्या प्रतिमांना
फ़ेकण्याची तयारी असावी लागते
ती किंमत देताना, मी मागे यायला नको
एकदा पाय मागे आला की तो
खोल गर्तेत जाणार!!!
आत्म शोधाचं थडगं
पुन्हा जिवंत नाही होणार...









# संपादकीय

**सुरेश शिरोडकर**

**आल्हाद काशीकर** हे मुक्त पत्रकार असून विविध दिवाळी अंक आणि वृत्तपत्रातून सामाजिक समस्यांवर अभासपूर्ण लेखन करतात. मेळघाटमधील कुपोषणावरचे त्यांचे दैनिक "लोकसत्ता" मधील लेख विशेष गाजले होते. वयाच्या २१व्या वर्षापासूनच विविध सामाजिक आणि आर्थिक विषयांवर त्यांची व्याख्याने सुरु आहेत. नेल्सन मंडेला, फिडेल कॅस्ट्रो, मार्क्स, सॉक्रेटिस इ. व्यक्तिरेखांवर तसेच त्यांच्या अभ्यासातूनच लॅटिन अमेरिकन क्रांती, जागतिकीकरण, खुली अर्थव्यवस्था अशा अनेक विषयांवर ते ठिकठिकाणी व्याख्याने देत आहेत. याशिवाय अनेक सक्रीय सामाजिक संघटनांशी व कार्यकर्त्यांशी त्यांचे संबंध आहेत. मागील काही वर्षापासून विविध कॉलेजांमध्ये 'व्यक्तीमत्व विकासावर' ते व्याख्याने देत आहेत. शिवाय अधूनमधून मॅनेजमेंट कन्सल्टंसीही करतात.

बी.कॉम., एम.ए. (सोशॉलॉजी), एम.बी.ए. (मार्केटिंग) अशा डिगर्यांॅ बाळगणारा हा तरुण वातानुकूलीत ऑफिसात बसून नोकरी नव्हे, तर चक्क 'शेती' करतो. "निसर्गाच्या सान्निध्यात राहून आपण आपला व्यासंग जपू शकतो" या विचाराने झपाटलेल्या ह्या अमरावतीच्या तरुणाने शेतकी प्रशिक्षण घेऊन, सफेद मुसळी, कोलियस आदी वनौषधी शेतीची लागवड भाडेपट्ट्याने जमीन घेउन सुरु केली. सुखवस्तू घरात वाढलेला पण कधीही 'नांगर न धरलेला' हा तरुण शेती करतो या विशेषतेमुळे गेल्याच वर्षी महाराष्ट्र टाईम्सने "मुलखावेगळे तरूण" या सदराखाली त्यांचा गौरव केला. अर्थात, "कुठल्याही क्षेत्रात दीर्घकाळ काम करण्याची तयारी हवी" असं म्हणणारे आल्हाद त्यात काहीच वेगळं मानत नाही. शहराशी आवश्यक तितका संपर्क ठेवून "निसर्गाच्या सान्निध्यात अधिक समाधानाने आणि सुखाने जगता येतं" हे त्यांचे विचारसूत्र आहे. त्यांच्या मते "माणसाने जे आवडते त्यातच आयुष्य घालवावं आणि स्वतःचे आयुष्य कसे जगायचे याचं गणित स्वतःच ठरवावं".

उपजत आवाज असलेले आल्हाद हे उत्तम "गझल गायक" आहेत. प्रख्यात उर्दू शायर जानिसार अख्तर, निदा फाजली आदींच्या गझलांना स्वतः चाली लाऊन त्या गायल्याही आहेत. हिंदी-उर्दू शायरीचा अभ्यास केला असून सध्या ते उर्दू आणि शास्त्रीय गायनाचे धडे गिरवताहेत. वेगवेगळ्या सामाजिक विषयांवर ई टिव्ही-संवाद, सह्याद्री या वाहिन्यांवर त्यांच्या मुलाखतीही झाल्या आहेत. आल्हाद यांचा "अंतर्नाद" हा काव्य संग्रह प्रकाशित झाला असून त्याला शिरिष पै यांची प्रस्तावना आहे.

मृदुल, हळवे आणि नावाप्रमाणे 'आल्हादक' आल्हाद; कवी म्हणून मात्र एक आगळवेगळं रसायन अगदी "उकळतं तेजाब" आहे. कविता जन्माला यायला निमित्त लागते; सभोवतालची परिस्थीती हेच त्यांच्या कवितेचे निमित्त असावे. मेळघाटमध्ये समाजोपयोगी भटकंती करत असताना भोवतालची परीस्थिती त्यांना अस्वस्थ करत होती. हीच अस्वस्थता, वेदना त्यांनी आपल्या कवितांतून व्यक्त केली आहे. जीवनात घडलेल्या विविध घटनांचे पडसाद, मनातील घुसमट त्यांच्या कवितेतून व्यक्त होताना जाणवते.

समाजातील दंभावर प्रहार करताना त्यांची लेखणी जणू लाव्हा ओकते. "संस्कृतीचा जप..." या कवितेत त्यांची लेखणी इतकी आक्रमक बनते कि, सभ्य संकृतीच्या 'शिष्टाचाराचा मुखवटा' ती गिधाडाप्रमाणे लचके तोडून फाडून टाकते. समाजातल्या ढोंगीपणाची चीड व्यक्त करताना तीच लेखणी राजकारण्यांवर सुद्धा उलटते. शेतीप्रधान राज्यात कष्टकरी शेतकर्यांचीच खळगी भरण्याची पंचाईत, कापूस पिकवणार्यांकचेच अंग झाकण्याचीमुसिबत हा दैवदुर्विलास कि राज्यकर्त्यांचा नाकर्तेपणा? आधीच निसर्ग लहरी त्यात आणखी नेताही लहरी मग या कष्टकर्यांानी "जावे कुठे सांगा बरे.." (काहीशी मर्ढेकरांच्या "बोंड" कवितेची आठवण) असे ते कळवळून विचारतात.

मानवता हेच जीवनाचे मूल्य आहे पण हे कळायला सुद्धा माणसाला जात, धर्म, संस्कृती इ. कुबड्यांचा आधार का घ्यावा लागतो? धर्म नव्हता तेव्हा माणूस काय अधर्माने वागत होता? असा खोचक प्रश्न "जेव्हा धर्म नव्हता..." या कवितेतून कवी विचारतात. धर्माचा फोलपणा आणि धर्माने निर्माण केलेला माणसातला भेदभाव "स्मशान" कवितेत कवीने अचूक सांगितला आहे.

माणसाची झोकून देण्याची प्रवृत्ती कमी झाल्यावर त्या जागी थंडगार सावधपणा येऊ लागतो आणि हाच सावधपणा त्याला सोयिस्कर अलिप्त बनवतो. माणूस आज प्रतिष्ठेच्या, खोट्या प्रतिमांच्या अधीन जाऊन पुरता गुलाम झाला आहे. स्वत:चेच अस्तित्व विसरून तो कुणाचा ना कुणाचा 'बटिक' झाला आहे. हे पिंजर्यातले जीवन झिडकारून मनुष्याने स्वत:चा शोध घेण्याचे तत्वज्ञान "आत्मशोध" कवितेत सांगितले आहे.

'मृत्यू' हे आल्हाद यांच्या कवितेचे एक अटळ वैशिष्ट्य आहे. जन्माबरोबरच मृत्यू निश्चित झाला. मृत्यू अटळ आहे; मग माणूस स्वतः का बदलत नाही, तो असा का वागतो? याची कवीमनाला वाटणारी खंत "श्रद्धा सुमने वाहून..." कवितेत दिसून येते. मृत्युचे काळे ढग जीवनावर पसरलेले असताना सुद्धा मनुष्याचा दिशाहीन प्रवास सुरूच असतो. हा मार्ग कुठे जाणार? या प्रवासाचा अंत कसा होणार? हे जरी त्याला माहित नसले तरी सुद्धा जेथे अंतिम अंत असेल तेथे त्याला पोहोचावेच लागेल हे निर्णायक सत्य कवीने 'प्रवास" कवितेत सांगितलेले आहे.

आल्हाद यांच्या कविता भलेही अलंकारिक, वृत्तबद्ध किंवा छंदबद्ध नसतील पण जगण्याचे तत्वज्ञान हे त्यांच्या कवितेचे वैशिष्ठ आहे. कवितेवरची श्रद्धा हीच त्यांच्या कवितेच्या उज्वल भवितव्याची साक्ष पटवायला पुरेशी आहे. हिंदी-उर्दू शायरीच्या अभ्यासामुळे त्यांच्या कवितेत गझलकाराच्या वृत्तीतले कलंदर वैराग्य दिसून येते. गझलप्रमाणे त्यांची कविता काळजाच्या बोलीतून प्रगट होते. हाच हृदयाच्या कप्प्यातून आलेला 'अंतर्नाद' त्यांच्या अनेक कवितांतून उमटला आहे.

प्रत्येकाच्या मनात उमटणार्या. ह्या 'अंतर्नादाचा' वेध घेण्यास आल्हादच्या कविता प्रेरणादायी ठरतील याच उद्देशाने नवीन वर्षाच्या सुरुवातीला नेटाक्षरीच्या वाचकांसमोर काही वेगळं सादर करण्याचा हा एक प्रांजळ प्रयत्न आहे



## श्रद्धा सुमने वाहून आता...

श्रद्धा सुमने वाहून आता
जे गेले ते येणार नाही

वाहिलेले आयुष्य त्यांचे
पुन्हा परतून येणार नाही

ते होते तेंव्हा आम्ही
त्यांना जगणे असह्य केले

ते गेले आता त्यांची
सर कुणास येणार नाही

काळ कोणताही असो
सामान्य बदलले नाहीत

सर्वस्व पणास लावले त्यांनी
जग बदलविण्याच्या ध्यासाने

त्यांचे पुतळे उभारले जगाने
स्वतः मात्र बदलले नाहीत

## जेंव्हा धर्म नव्हता तेंव्हा

जेंव्हा धर्म नव्हता तेंव्हा
माणूस अधर्माने काय वागत होता ?
नशा धर्माची नसतानाही
असभ्य काय तो भासत होता ?
एवढेच असेल फ़क्त
दंगली तेंव्हा होत नसतील
संशयाच्या द्वेषाच्या भिंती
अस्तित्वातच नसतील
त्यावेळी केवळ माणूस माणसास
ओळखत असेल
धर्मापेक्षाही माणूस तेंव्हा
महत्वाचा असेल
त्यावेळी माणसाची ओळख
फ़क्त माणूसच असेल
माणूस फ़क्त माणूस
फ़क्त माणूस फ़क्त माणूस असेल







## जगाच्या नजरेत मी गुन्हेगार ठरलो

जगाच्या नजरेत मी गुन्हेगार ठरलो
अगतिक झालो, लाचार झालो
अनेकांनी घाव घातले
अनेकांचे मनोरंजन झाले

जगाच्या पद्धती कळल्या
वागण्याच्या रीती कळल्या
व्यवहारी पुस्तकातील नव्या नव्या
व्याख्याही कळल्या

पूर्वी सरळ मार्ग दिसे
आता आडवाटा कळल्या
कृतज्ञ फ़ार कमी भेटले
कृतघ्नांचा जल्लोश होता
उपकारकर्त्यांस जीवे मारणे
हा येथला रिवाज होता

तडफ़डणारे जीव पाहून
आनंद घेणारे पाहिले
माणसांच्या शरीरांचे
सौदे होताना पाहिले

झगमगणा-या दुनियेत
करूण कहान्या पाहिल्या
अनेकवेळा मीच मला
श्रद्धांजल्या वाहिल्या

## बेवारस मुले

हा रस्ता रहदारीचा
तुमच्या आमच्यासाठी
हेच अंगण, हेच घर
रस्त्यावरच्या बेवारस मुलांसाठी

रोजरात्री काळोखात
लाखो घरे आकार घेतात
सूर्याच्या किरणांनी सकाळी
पुन्हा ती विरून जातात

पुन्हा तेथे वाहनं चालतात
छोटी छोटी अनाथ मुलं
पुन्हा मग रस्त्यावर येतात
भिरभिरत्या नजरेने
जगाकडे बघतात

त्यांना जग कळत नाही
जीवन काय ते समजत नाही
माय नाही ! बाप नाही
धर्म नाही, राष्ट्र नाही

आणि गोंडस संस्कृतीही नाही



**संस्कृतीचा जप करणा-यांनो**

संस्कृतीचा जप करणा-यांनो
सभ्यतेच्या पुतळयांनो
पोटं भरली असताना
शिष्टाचार सांगणा-यांनो

दाखवा बरे सभ्यता तुमची
पोटात जेंव्हा आग पडेल
संस्कृतीही पाहू तुमची
रस्त्यावर जेंव्हा संसार चालेल

आज भणंग उध्वस्त आम्ही
आम्हास तुम्ही शिकवा जरूर
आम्हास मात्र तुमच्यापेक्षा
आधार गिधाडांचा चालेल



## जावे कुठे सांगा बरे

जावे कुठे सांगा बरे
कोणी नसे अमुचा सखा
राज्यकर्त्यांच्या पायी
रोज आमचे मरण बघा

निसर्गही अमुचा वैरी झाला
वेळोवेळी देतो दगा
आबाळ मुलांची बघवत नाही
गुरांचे हाल पाहवत नाही

कष्टणारे हात आमचे
सगळ्याची खळगी भरतात
दैवदुर्विलास असा
लेकरे अमुचीच उपाशी मरतात

पैसा अडका दागिन्यांची
आम्हीच करतो हो उपेक्षा
एवढा कापूस पिकतो
अंग झाकण्याची अपेक्षा





**अद्यापही तो मिळाला नाही**

खूप शोध घेऊनही
तो मला मिळाला नाही
जो खरा हवा होता
तो माणूस गवसला नाही
पाहिली मी मंदिरे
मशिदीही पाहिल्या
चर्चही पाहिली अन
अग्यारिही पाहिल्या

सर्वत्र सामसूम होती
आसपासही तो दिसला नाही
माझीच दिशा चूकली होती
माझाच अंदाज फ़सला होता
मी जी ठिकाणं निवडली
तो भाबडा विश्वास होता

तो मला मिळाला
रस्त्यावर नंग्या तलवारी घेऊन
राम रहीमच्या घोषणात
बेभान मानवी रक्त पिऊन

त्यानंतर तो मिळाला
जगाच्या बाजारामध्ये
शेअरप्रमाणे त्याचाही भाव
वरखाली होत होता
एकदा तो सपशेल पडला
अद्यापही मिळाला नाही

## प्रवास

जन्मास आलो तेंव्हाच
मृत्यु निश्चित झाला

सुखासोबत दुःखाचा
सहवास निश्चित झाला

तारुण्य आणि वृद्धत्व
दोन्ही जगणे आले

जन्मास आलो आणि
हा जीव प्रवासी झाला

हा मार्ग जाणार कोठे
हे कोणास ठाऊक होते?

चालणे वा थांबणे
हेही कोठे हातात होते?

ह्या प्रवासाचा अंत
कोठे कसा करावा लागेल?

अंतिम अंत जिथे असेल
तेथे पोहचावेच लागेल !



## दिशा

चारही दिशा खुल्या दिसतात
मार्ग कसा गवसत नाही
हेही मनास पटत नाही
तेही खोटे वाटत नाही

कुणी जग व्यापून टाकतो
कुणी स्वतःस विसरून जातो
कुणी स्वतःस व्यापून टाकतो
जगाला विसरून जातो

तुमचं आमचं आयुष्य किती?
त्यातही जगण्याचे क्षण किती?
तरीही आम्ही मोजतोच ना
पृथ्वीचे वय किती?



## स्मशान

शरीरासोबत मानवाच्या
स्मशानेही वाटली जातात

चार धर्म चार प्रेते
चार दिशांना घेऊन जातात

त्या जड मातीसाठी
धर्मांची स्मशाने वेगळी

अंत्यविधीसाठी देखील
प्रत्येकाची पद्धती वेगळी

अंत्यविधी कसाही होवो
शेवटी माती मातीत मिसळते

वेगवेगळ्या धर्मांची माती
वेगळी का कुणास सापडते?






# काळ

काळ अमर्याद आहे
मानवाला मर्यादा आहेत

कोणतीच सुखं कोणतीच दुःखं
काळासोबत टिकत नाहीत
काळासोबत पिढ्या जातात
तत्वज्ञानही टिकत नाही

कालचक्र फ़िरत राहते
तत्वज्ञानही दरवेळी नवा चेहरा
घेऊन येते

काळ चिरंतन सनातन आहे
त्याचा प्रवास अखंड आहे
आम्ही एकाच काळात जगतो
तो सर्व काळात आहे

आम्हाला इतिहासात नेऊन
तो वर्तमानातही असतो
आणि भविष्यातही
आमचा जेंव्हा तो काळ असतो
काहींचा वर्तमान असतो
काहींचे भविष्य असतो

तो कुणावर विसंबून नसतो
कुणासाठी थांबत नसतो
विश्वाच्या अस्तित्वाशी त्याचा
काही संबंध नसतो

काळाचे संदर्भ कधीतरी बदलतील
खूप काळ लोटल्यावर
कदाचित ते बदलतील
त्यावेळी सूर्य विझला असेल
मानवाची चिता पेटण्यास
सुर्यावर तेंव्हा अग्नी लागेल

## काव्य

मी काव्य लिहीत गेलो
तो काव्य जगला

कल्पना ज्या केल्या मी
तो प्रत्यक्षात आणत गेला

मार्गांचे विश्लेषण मी केले
मार्गांना पार त्याने केले

मी कल्पनांचे साम्राज्य उभारले
त्याने दुबळ्यांना सम्राट केले

तोही जग सोडून जाईल
मीही जग सोडून जाईन

शोकसभेतील रटाळ भाषणे
तेंव्हा माझ्या वाट्यास येतील

भग्न हृदयांचे हुंकार मात्र
तो घेऊन जाईल...





# मी

माझा देह जाळताना
त्यांना यातना होत होत्या

मी तर कधी त्यात नव्हतो
मी कधीही तो नव्हतो

माझा देह लाकडाप्रमाणे
जरी त्यात जळत होता

चुकलो तो माझा
माझा कधीच नव्हता

माझे खरे अस्तित्व
आता प्रकट झाले होते

आजवर मी फ़सलो
आज मलाच मी गवसलो

विश्वाच्या अनंत पोकळीत
मी विस्तारलो होतो

चौकटीत बांधलेला मी
मुक्त झालो होतो



**दाद रसिकांची मिळावी**
**तार हृदयाची छेडावी**
**असे गाणे गावे**
**एखाद्या कवीने**

**हृदयात अंगार पेटावी**
**दाद पिडीतांची मिळावी**
**असे आयुष्य जगावे**
**एखाद्या क्रांतीकारकाने**






*रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ५०००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे.*

*हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लाभावा हीच इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.*

*हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना ,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..* netaksharee@gmail.com